राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० च्या संदर्भात “संपर्क साहित्य तयार करणे” या विषयाबाबत शिक्षकांसाठी ऑनलाईन स्पर्धा आयोजित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.एनईपी २०२०/प्र.क्र.९८/एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ सप्टेंबर, २०२०

वाचा :- १) केंद्र शासनाचे, शालेय शिक्षण व साक्षरता विभागाचे अ.शा. पत्र क्र २१०८२०/Secy(SE&L)/३, दि.२१.०८.२०२०

परिपत्रक :-

शिक्षण मंत्रालय, भारत सरकार व MyGov यांच्या संयुक्त विद्यमाने राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० च्या संदर्भात “संपर्क साहित्य तयार करणे” या विषयाबाबत शिक्षकांसाठी ऑनलाईन स्पर्धा आयोजित करण्यात येत आहे. सदर स्पर्धेसाठी शिक्षण मंत्रालय भारत सरकार यांनी नोडल एजन्सी म्हणून NCERT या संस्थेस नियुक्त केले आहे.

**अ) सदर स्पर्धेचे विषय व स्पर्धेचे स्वरूप:-**

१) बालपणातील सुरुवातीची काळजी व शिक्षण - अध्ययनाचा पाया.
२) पायाभूत साक्षरता व अंकगणित- अध्ययनासाठी तातडीची व आवश्यक पूर्व अट.
३) विद्यार्थ्यांचे गळतीचे प्रमाण घटविणे व सर्व स्तरावर सार्वत्रिक प्रवेश(Universal Access)सुनिश्चित करणे.
४) शाळेमध्ये अभ्यासक्रम व अध्यापन पध्दती - सर्वंकष, एकात्मिक आनंददायी व खिळवून ठेवणारे असावे.
५) शिक्षक व शिक्षक शिक्षण.
६) न्याय्य व समावेशक शिक्षण - सर्वांसाठी अध्ययन.
७) शाळा संकुल / समूह यांच्यामार्फत कार्यक्षम साधनसामग्री पुरविणे व परिणामकारक प्रशासन.
८) शालेय शिक्षणासाठी दर्जानिश्चिती (Standard-Setting) व मानांकन (Accreditation) करणे.
९) व्यावसायिक शिक्षणाची पुनर्कल्पना (Re-imagining).
१०) प्रौढ शिक्षण.
११) भारतीय भाषा, कला व संस्कृती यांना प्रोत्साहन.

१२) ऑनलाईन व डिजिटल शिक्षण - तंत्रज्ञानाचा न्याय्य वापर सुनिश्चित करणे

**ब) संपर्क साहित्य खालील स्वरुपात पाठवावे :-**

१) चित्रपट - कालावधी १ ते २ मिनिट (MP४)

२) भित्तीपत्रक - भित्तीपत्रकाचा आकार - १२" x ८"

३) इन्फोग्राफीक्स - पॉवर पॉईंट व स्लाईड्स स्वरुपात

**क. स्पर्धेचा कालावधी :-**

१) सदर स्पर्धा शालेय स्तरावर प्रथमत: दि.५ सप्टेंबर, २०२० ते २५ सप्टेंबर, २०२० या कालावधीत आयोजित करण्यात येणार आहे.

२) त्यानंतर वरील कालावधीत प्राप्त होणा-या साहित्याची दि.२५ सप्टेंबर ते दि.१५ ऑक्टोबर, २०२० या कालावधीत तालुका/ जिल्हा / राज्य या स्तरावर निवड करण्यात येईल.

**ख. स्पर्धेचे मूल्यमापन:-**

१) राज्य स्तरावर प्राप्त होणाऱ्या साहित्याचे मुल्यमापन करण्यासाठी खालील प्रमाणे राज्यस्तरीय निवड समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | पद |
|---|---|---|
| १ | श्री.विकास गरड<br>प्र.प्राचार्य, समन्वय विभाग | अध्यक्ष |
| २ | डॉ. कमलादेवी आवटे<br>प्राचार्य,समता विभाग | सदस्य |
| ३ | डॉ. नेहा बेलसरे<br>प्र.प्राचार्य, सेवपूर्व विभाग | सदस्य |
| ४ | डॉ. जगराम भटकर<br>उपविभाग प्रमुख, मराठी विभाग | सदस्य |
| ५ | श्री. लक्ष्मण सुपे<br>उपविभाग प्रमुख, बालशिक्षण विभाग | सदस्य |
| ६ | श्री. वर्षाराणी भोपळे<br>उपविभाग प्रमुख, समग्र विभाग | सदस्य |
| ७ | डॉ. गीतांजली बोरुडे<br>उपविभाग प्रमुख, संशोधन विभाग | सदस्य |
| ८ | डॉ. सरस्वती सूर्यवंशी<br>उपविभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान विभाग | सदस्य |
| ९ | श्री. राजेंद्र वाकडे<br>उपविभाग प्रमुख, अभ्यासक्रम विभाग | सदस्य सचिव |

२) जिल्हास्तरावर सदर स्पर्धेच्या अमंलबजावणी साठी खालिल प्रमाणे जिल्हास्तरीय निवड समिती गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकारी | पद |
|---|---|---|
| १ | प्राचार्य,जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था | अध्यक्ष |
| २ | शिक्षणाधिकारी प्राथमिक | सदस्य |
| ३ | शिक्षणाधिकारी माध्यमिक | सदस्य |
| ४ | अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था | सदस्य |
| ५ | वरिष्ठ अधिव्याख्याता, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था | सदस्य सचिव |

३) यामधील सर्वोत्कृष्ट १० साहित्य दि.१५ ऑक्टोबर, २०२० नंतर SCERT च्या व शालेय शिक्षण विभागाच्या संकेतस्थळावर प्रदर्शित करण्यात येतील.

४) त्यानंतर सदर साहित्य NCERT द्वारे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या लिंकवर राष्ट्रीय स्पर्धेसाठी पाठविण्यात येईल.

२. एखादे साहित्य स्थनिक भाषेमध्ये असल्यास सदर साहित्यासोबत एक स्पष्टीकरणात्मक टिप्पणी SCERT ने पाठवावी .स्पर्धकांनी सादर केलेल्या साहित्यचा वापर शिक्षण विभाग भविष्यात करु शकेल.

३. प्रस्तुत स्पर्धेसाठी राज्य स्तरावर राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (SCERT),महाराष्ट्र, पुणे या संस्थेची नोडल एजन्सी म्हणून व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र,पुणे यांना नोडल ऑफीसर म्हणून नियुक्त करण्यात येत आहे. सदर स्पर्धेचे आयोजन करणे, शिक्षकांचा सहभाग नोंदविणे, प्राप्त झालेल्या साहित्याचे मुल्यमापन करणे व अंतिम निवडलेले साहित्य NCERT कडे पाठविणे या कामांची जबाबदारी नोडल ऑफीसर यांच्यावर निश्चित असेल.

४. जिल्हास्तरावर व राज्यस्तरावर स्पर्धक शिक्षकांनी साहित्य पाठविण्यासाठी राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (SCERT) मार्फत लिंक उपलब्ध करून देण्यात येईल.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९१७१३०९५४७७२१ आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.09.17 13:11:14 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा.मंत्री शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव
५. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई
६. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, महाराष्ट्र
९. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य
१०. शिक्षण संचालक, प्राथमिक
११. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी
१४. निवड नस्ती (एसडी-६)